स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांना कनिष्ठ अभियंता पदाची पदोन्नती अथवा कालबध्द पदोन्नती देतांना वयाची ४५ वर्षे पूर्ण झाल्यामुळे व्यावसायिक परीक्षेतून सूट मिळणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन परिपत्रक क्र. पदनि-३९०८/प्र.क्र.५८६/आस्था-१०,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक- २३ ऑगस्ट, २०१०.**

वाचा:- १) शासन निणर्य , सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-इएक्सडी-१०७६/४५२/१७, दि. २८ नोव्हेंबर, १९७९.
२) शासन परिपत्रक,ग्राम विकास विभाग क्र. एपिटी-१०८८/सीआर-९२१/१३, दि. २० नोव्हेंबर, १९८९.
३) शासन पत्र,ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. पदनि-२६०५/प्र.क्र.७५०/ आस्था-१०, दि. २२ जून, २००७.

## परिपत्रक

स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांना वयाची ४५ वर्षे पूर्ण झाल्यानंतर कालबध्द पदोन्नती अथवा पदोन्नती देतांना व्यावसायिक परीक्षेतून सूट देण्याबाबत जिल्हा परिषद कर्मचारी संघटनांची विनंती होती. या प्रकरणी स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांच्या संघटनेशी दि. १२ जुलै, २०१० रोजी सचिव, ग्राम विकास विभाग यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीत सविस्तर चर्चा झाली. उपरोक्त वाचा १ येथे उल्लेख केलेल्या शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाच्या दि. २८ नोव्हेंबर, १९७९ च्या शासन निणर्यानुसार वयाची ४५ वर्षे पूर्ण करणाऱ्या कर्मचाऱ्याला विभागीय परीक्षेतून व पदोन्नतीसाठी पात्र ठरविणाऱ्या परीक्षेतून सूट देण्याबद्दल आदेश आहेत. त्यास अनुसरुन वरील वाचा २ येथे उल्लेख केलेल्या या विभागाच्या दि. २० नोव्हेंबर, १९८९ च्या परिपत्रकान्वये वयाची ४५ वर्षे पूर्ण झाल्यामुळे जिल्हा परिषदेच्या वर्ग-३ व ४ च्या कर्मचाऱ्यांना पदोन्नतीसाठी शासनाने विहित केलेल्या विभागीय परीक्षेतून व भाषा परीक्षेतून सूट देण्यास जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी हे सक्षम असल्याबाबत शासनाच्या विधी व न्याय विभागाच्या अभिप्रायास अनुसरुन आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

२. या विभागाच्या वर उल्लेखिलेल्या वाचा 3 येथील दि. २२ जून, २००७ च्या पत्रान्वये मेस्त्री ग्रेड-१, रोख कारकून, मस्टर क्लर्क, इ. कर्मचाऱ्यांना त्यांच्या या पदावरील नियुक्तीच्या दिनांकापासून पुढे १२ वर्षे सेवा झाल्यानंतर कनिष्ठ अभियंता पदाची वेतनश्रेणी, कालबध्द पदोन्नती / आश्वासित

प्रगती योजनांतर्गत लागू करण्यास शासनाची मान्यता देण्यात आलेली होती. तथापि, वयाची ४५ वर्षे पूर्ण करणाऱ्या स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांना व्यावसायिक परीक्षेतून सूट अनुज्ञेय आहे किंवा कसे याबाबत विविध जिल्हा परिषदा व विभागीय आयुक्त यांच्याकडून या विभागास विचारणा करण्यात येत होती. जिल्हा परिषदेच्या वर्ग-३ व ४ च्या कर्मचाऱ्यांबाबत महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम १९६१ च्या कलम २४८ व याबाबतच्या इतर तरतुदीनुसार शासनास प्राप्त असलेल्या अधिकारात असे आदेश देण्यात येत आहेत की, जिल्हा परिषदेमध्ये कार्यरत असलेल्या व वयाची ४५ वर्षे पूर्ण करणाऱ्या स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांना कनिष्ठ अभियंता पदाची पदोन्नती अथवा कालबध्द पदोन्नती /आश्वासित प्रगती योजनांतर्गत लाभ देतांना व्यावसायिक परीक्षेतून सूट देण्यात यावी.

हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट वर संकेतांक क्र.२०१००८२३१८२८०९००१ वर देण्यात आलेले आहेत

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( प्रकाश हिर्लेकर )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत-

विभागीय आयुक्त, (सर्व विभाग)
मुख्य कार्यकारी अधिकारी ( सर्व जिल्हा परिषद)
निवड नस्ती आस्था-१०,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
आस्था- ७,८,९,११,१२,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
श्री रा. म. लेडांगे, सरचिटणीस,महाराष्ट्र राज्य स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संघ, जिल्हा परिषद कॉलनी, वणी, पिनकोड नं. ४४५ ३०४, ता. वणी, जि.यवतमाळ.
श्री अशोक थूल, सरचिटणीस, महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद कर्मचारी महासंघ, ७०-अ, गायकवाड कॉलनी, आंबेडकरनगर, धरमपेठ, नागपूर.